**महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई या महामंडळास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत निधी वितरीत करणेबाबत (Conditional)...**

**महाराष्ट्र शासन**

**दिव्यांग कल्याण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : दिविम-२०२४/प्र.क्र.६३/दिव्यांग कल्याण-३**

३१,३२,३५ ए, तिसरा मजला, ए-विंग, मित्तल टॉवर,
नरीमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२१.
दिनांक :- ३१ मार्च, २०२५

**वाचा:**
१. वित्त विभाग, शा.नि.क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२४/२०२२/विनियम, दि.१२.०१.२०२३.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५.
४. दिव्यांग कल्याण विभाग, शा.नि.क्र.दिविम-२०२४/प्र.क्र.६३/दि.क.३, दि.०५.१२.२०२५.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे दिनांक ०६.०९.२०२३ चे पत्र

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचेमार्फत राज्यातील दिव्यांगाना स्वयंरोजगारासाठी कर्ज स्वरुपात अर्थसहाय्य करण्यात येते. कर्ज वितरणासोबतच दिव्यांगांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने विविध योजना महामंडळामार्फत राबविण्यात येतात. तसेच राष्ट्रीय विकलांग वित्त एवम् विकास निगम, नवी दिल्ली या राष्ट्रीय महामंडळाची राज्य प्राधिकृत वाहिनी म्हणून हे महामंडळ काम करते.

२. महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. झेडआय-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण (अनिवार्य) (२२३५ D३६४) या लेखाशीर्षाखाली योजनांर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता रुपये ९०.२१ लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये महामंडळास ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता रुपये ५४.१२ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकानुसार ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरीता निधी वितरणाची मर्यादा ७० टक्के निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार वित्त विभागाकडून ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या

उद्दीष्टाकरीता ७० टक्क्यांच्या मर्यादेत निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणाली (BEAMS) वर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. बिम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या.,मुंबई यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. झेडआय-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण (अनिवार्य) (२२३५ D३६४) या लेखाशीर्षाखाली योजनांतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरीता सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत रुपये ३६,०९,०००/- (अक्षरी रुपये छत्तीस लक्ष नऊ हजार फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे:-

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | अनिवार्य योजनेचे नाव | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | सन २०२४-२५ करीता सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूद | सन २०२४-२५ करीता विभागाकडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मागणी क्र.झेडआय-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदाने (अनिवार्य) | २२३५ D३६४ ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | ९०,२१ | ३६,०९ |

२. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या परिपत्रकामध्ये नमूद परिच्छेद ४ ते १८ मधील मार्गदर्शक सूचना व परिशिष्टातील मार्गदर्शक सूचना तसेच वित्त विभागाच्या दिनांक १७.०३.२०२५ च्या परिपत्रकातील परिच्छेद ५ मधील मार्गदर्शक सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

३. या बाबींवरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक झेडआय-३,**
**२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,**

**०२ समाज कल्याण,**
**१०१ अपंगांचे कल्याण,**
**(०८) दिव्यांग कल्याण संस्थांना अनुदाने**
**(०८) (०१) महराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदान (अनिवार्य) (२२३५ D३६४),**
**३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)**

४. या व्यवस्थापकीय अनुदानाबाबत उप सचिव (दिव्यांग कल्याण-२), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम पुढील कार्यवाहीकरीता आहरण व संवितरण अधिकारी, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सुपुर्द करण्यात येत आहे. **वित्त विभाग, शा.नि.क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२४/२०२२/विनियम, दि. १२.०१.२०२३ नुसार सदरचे अनुदान हे सशर्त आहे.** त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत. सदर निधी महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास "आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personal Deposit Account-VPDA) खाते क्रमांक 7101NG0009 मध्ये अदा करण्यात यावा. निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासन व महालेखापाल कार्यालयास सादर करावे. तसेच याबाबत खर्चाचा ताळमेळ घेवून त्याबाबतची माहिती महालेखापाल यांना महामंडळाने द्यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ अन्वये व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक-**४४५/२०२५/व्यय-१४, दिनांक ३१/३/२०२५** अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११७२५५६८२३५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SUNANDA MOHANRAO GHADYALE

Digitally signed by SUNANDA MOHANRAO GHADYALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PERSONS WITH DISABILITIES WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C5ADFF2513F33AFA9ED70C79C5A4636204D8BB4040BF2C6C2470D0F20D8DC79D, cn=SUNANDA MOHANRAO GHADYALE
Date: 2025.03.31 17:26:59 +05'30'

**(सुनंदा मो.घड्याळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या.,मुंबई.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

४) उप सचिव (दिव्यांग कल्याण-२/३), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

५)प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, नवी मुंबई.

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

७)जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/ठाणे.

८)निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

९) अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.

१०) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प/साउ), मंत्रालय, मुंबई.

११) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.

१२) अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन-दि.क.२, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) निवड नस्ती/दिव्यांग कल्याण-३.

***